सन २०२५-२६ करिता लेखाशीर्ष २२४५ २१९४ व लेखाशीर्ष २२४५ २३८१ अंतर्गत उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्याकरिता प्राधिकृत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन,आ.व्य.प्रभाग)**
मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय,मुंबई-४०००३२.
शासन निर्णय क्र एससीवाय-०४/२०२५/प्र.क्र.५६/म-११
दिनांक:-३० मे, २०२५

वाचा : महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.सीएलएस-२०२४/प्र.क्र.१८२/म-३, दि.८.८.२०२४.

**प्रस्तावना :-**

जून ते ऑक्टोबर, २०२४ या कालावधीत अतिवृष्टी व पूर या नैसर्गिक आपत्तींमध्ये आपदग्रस्तांच्या कपड्यांच्या व घरगुती भांडी/वस्तू यांच्या झालेल्या नुकसानीकरिता व दुकानदार व टपरीधारकांच्या झालेल्या नुकसानीकरिता विशेष/वाढीव दराने मदत करण्यास संदर्भाधीन दि.८.८.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. माहे मे, २०२५ मध्ये राज्यात सर्वदूर अतिवृष्टी झाली असून अनेक ठिकाणी पूरसदृश परिस्थिती निर्माण झाली आहे. तद्नुषंगाने, दि.२७.५.२०२५ रोजी झालेल्या मा.मंत्रिमंडळ बैठकीमध्ये संदर्भाधीन दि.८.८.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये बाधित कुटुंबांना घरगुती भांडी, वस्तू आणि कपड्यांसाठी देण्यात येणारी मदत तसेच दुकानदार व टपरीधारकांना देण्यात येणारी मदत ही **खरीप-२०२५ करितादेखील लागू ठेवण्याचा निर्णय** झाला आहे. सबब, आपदग्रस्तांच्या कपड्यांच्या व घरगुती भांडी/वस्तू यांच्या झालेल्या नुकसानीकरिता विशेष/वाढीव दराने करावयाच्या मदतीचे वाटप तातडीने करता यावे, यासाठी लेखाशीर्ष २२४५ २१९४ अंतर्गत व दुकानदार व टपरीधारकांना देण्यात येणाऱ्या मदतीचे वाटप तातडीने करता यावे, याकरिता लेखाशीर्ष २२४५ २३८१ अंतर्गत उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२५-२६ या वित्तीय वर्षात नैसर्गिक आपत्तींमध्ये आपदग्रस्तांच्या कपड्यांच्या व घरगुती भांडी/वस्तू यांच्या झालेल्या नुकसानीकरिता विशेष/वाढीव दराने करावयाच्या मदतीचे वाटप तातडीने व्हावे, याकरिता मागणी क्र.सी-६; मुख्य लेखाशीर्ष २२४५, नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य; ०२ पूर, चक्रीवादळे इ.; १०१, अनुग्रह सहाय्य; (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकांव्यतिरिक्त खर्च; (९२) (०१) रोख भत्ता, मृत व्यक्तींच्या कुटुंबियांना सहाय्य व जखमींना मदत (अनिवार्य); ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (सशर्त) **(२२४५ २१९४)** या लेखाशीर्षांतर्गत देयके अदा करण्याकरिता उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच दुकानदार व टपरीधारकांच्या झालेल्या नुकसानीकरिता विशेष/वाढीव दराने करावयाच्या मदतीचे वाटपदेखील तातडीने व्हावे, याकरिता मागणी क्र.सी-६; मुख्य लेखाशीर्ष २२४५, नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य; ०२, पूर, चक्रीवादळे इ.; ११९, हानी पोहोचलेली हत्यारे व साधनसामग्री यांची दुरुस्ती/ती नव्याने पुरविणे यासाठी कारागिरांना सहाय्य; (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकांव्यतिरिक्त खर्च; (९२) (०१) हानी पोहोचलेली हत्यारे व

साधनसामग्री यांची दुरुस्ती/ती नव्याने पुरविणे तसेच कच्च्या प्रक्रियाधीन व तयार करावयाच्या मालाच्या नुकसानीसाठी कारागिरांना सहाय्य (अनिवार्य); ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) **(२२४५ २३८१)** या लेखाशीर्षातर्गत देयके अदा करण्याकरिता उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. नैसर्गिक आपत्तींमध्ये आपदग्रस्तांच्या कपड्यांच्या व घरगुती भांडी/वस्तू यांच्या झालेल्या नुकसानीकरिता विशेष/वाढीव दराने द्यावयाची मदत वाचा येथील नमूद दि.८.८.२०२४ च्या शासन निर्णयानुसार देण्यात यावी.

३. उणे प्राधिकारपत्रावर निधी वितरीत करताना संबंधित अधिकारी यांनी उक्त बाबींचे पंचनामे झाले असल्याची खातरजमा करून निधी वितरीत करावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३१२/२०२५/व्यय-९, दि.३०.०५.२०२५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५३०१८२९४८८२१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARUN CHANGDEO KOLHE

Digitally signed by ARUN CHANGDEO KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=5954cbf120ac1f332056b65de0d4dfa85b619ad7d64fcd736ceb3dee77603425, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7AB6FCE2D956CE4C6E9BFC3EA1AB5FC2F17BEA07DB8AF21ACA4BEDED302CE9F9, cn=ARUN CHANGDEO KOLHE
Date: 2025.05.30 18:31:28 +05'30'

**(अरुण कोल्हे)**

**वित्तीय सल्लागार व सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. अपर मुख्य सचिव ( वित्त), मंत्रालय, मुंबई
२. सर्व विभागीय आयुक्त
३. सर्व जिल्हाधिकारी
४. मा.महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
५. मा.महालेखापाल -१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
६. संचालक, लेखा व कोषागरे, मंत्रालय, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. वित्त विभाग (व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय, मुंबई
१०.सह सचिव, (ब-१/२), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
११.अवर सचिव, कार्यासन म-३, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवडनस्ती (म-११)